राज्यसेवा (मुख्य) परिक्षा-२०१४ च्या अंतिम निकालाच्या आधारावर महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून निवड करण्यात येणा-या मंत्रालयीन कक्ष अधिकारी, गट ब संवर्गातील उमेदवारांच्या परिविक्षाधीन प्रशिक्षण कालावधी करिता अधिसंख्य पदे निर्माण करणेबाबत

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग
**शासन निर्णय क्रमांकः कअस १३१५/प्र.क्र.५५/२०१५/१४ब**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: १७ एप्रिल, २०१५

**संदर्भ:-**

१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक टिआरएन २०१३/प्र.क्र.८४/१३/१२-अ, दिनांक २०.०१.२०१४
२) सामान्य प्रशासन विभागाचे पत्र क्र. टिआरएन-०२१५/प्र.क्र.१८/१५/१८-ब, दिनांक २५.०२.२०१५
३) शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक पदनि २०११/प्र.क्र.१८५/११/वित्तीय सुधारणा-१, दिनांक २६.०८.२०११
४) शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक पदनि २०१२/प्र.क्र.६६/१२/वित्तीय सुधारणा-१, दिनांक ११.०७.२०१२

**प्रस्तावना:-**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत राज्यसेवा परिक्षेद्वारे सन २०१४ पासून प्रतिवर्षी सरळसेवेने नियुक्त होणा-या गट-अ मधील पदांसाठी यशदा, पुणे या संस्थेमार्फत व गट-ब मधील पदांसाठी वनामती, नागपूर या संस्थेमार्फत दोन वर्षांच्या कालावधीसाठी एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम संदर्भाधीन क्र. १ च्या शासन निर्णयानुसार राबविण्यात येत आहे. त्याअनुषंगाने राज्यसेवा (मुख्य) परीक्षा -२०१४ च्या अंतिम निकालाच्या आधारे मंत्रालयीन कक्ष अधिकारी गट ब संवर्गामध्ये महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून निवड करण्यात येणा-या उमेदवारांसाठी अधिसंख्य पदे निर्माण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून राज्यसेवा (मुख्य) परीक्षा -२०१४ नुसार निवड करण्यात येणा-या मंत्रालयीन कक्ष अधिकारी संवर्गातील उमेदवारांसाठी रू.९३००-३४८००, ग्रेड वेतन

रू. ४८००/- या वेतनश्रेणीत २ अधिसंख्य पदे दि. ०२.०५.२०१५ पासून दोन वर्षाच्या कालावधीकरिता निर्माण करण्याकरिता शासन मंजूरी देत आहे.

२. सदर २ अधिसंख्य पदे सामान्य प्रशासन विभागाच्या आस्थापनेवर निर्माण करण्यात येत आहेत.

३. मंत्रालयीन कक्ष अधिकारी गट ब संवर्गातील सदर २ अधिसंख्य पदांच्या वेतनाचा येणारा खर्च या विभागाच्या "मागणी क्र.ए-४ २०५२-सचिवालय- सर्वसाधारण सेवा ००२५ - ०१ वेतन" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि सन २०१५-१६ व सन २०१६-१७ या वित्तीय वर्षाच्या मंजुर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ८२/विसु-१, दिनांक २७.०३.२०१५ अन्वये व शासन निर्णय वित्त विभाग क्र. पदनि-२०११/प्र.क्र.१८५/११/वित्तीय सुधारणा-१, दिनांक २६.०८.२०११ व क्र. पदनि २०१२/प्र.क्र.६६/१२/वित्तीय सुधारणा-१, दिनांक ११.०७.२०१२ मधील तरतुदीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०४१७१६१७०४९२०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Satish Karbhari Jondhale

Digitally signed by Satish Karbhari Jondhale
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=GAD, postalCode=400020, st=Maharashtra, cn=Satish Karbhari Jondhale
Date: 2015.04.17 16:28:11 +05'30'

**( स.का.जोंधळे )**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. महालेखापाल -१ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई ४०० ०२०.
२. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई ४०० ०२०.
३. महालेखापाल-२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, नागपूर.
४. महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर.
५. अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.

६. महासंचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, राजभवन आवार, बाणेर रस्ता, पुणे.

७. महासंचालक, वसंतराव नाईक राज्य कृषी विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, वनामती, बोले पेट्रोल पंप जवळ, अमरावती रोड, धरमपेठ, नागपूर - ४४२ ४१०.

८. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई

९. अवर सचिव, का. क्र.१२-अ, १८-ब, २५, २६, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई

१०.जिल्हा कोषागार कार्यालय, नागपूर.

११.वित्त विभाग (वित्तीय सुधारणा-१), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई

१२.निवडनस्ती.